दिनांक २२.११.१९९६ नंतर महाराष्ट्र
मेरीटाईम बोर्डाकडे नियुक्त करण्यात
आलेल्या बंदर संघटनेतील अधिकारी
व कर्मचारी यांना "आर्थिक लाभ"
देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्र.ईपीटी १०९८/सीआर-८८/बंदरे-२
मंत्रालय, मुंबई-३२ दि. २५ जुन [illegible], २००३

वाचा: १) शासन निर्णय क्र.ईपीटी १०९६/प्र.क्र.१३३/परि-५, दि.२२.११.१९९६
२) शासन निर्णय क्र.ईपीटी १०९७/सीआर-१/परि-५, दि.२३.०४.१९९७
३) शासन निर्णय क्र.ईपीटी १०९७/सीआर-१/बंदरे-२, दि.०७.०२.२००३

प्रस्तावना :-उपरोक्त वाचा १ मधील शासन निर्णयानुसार बंदर संघटनेचे दिनांक २२.११.१९९६ पासून महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डात रुपांतर करण्यात आले व बंदर संघटना विभाग प्रमुख जलपरिवहन आयुक्त व त्यांच्या अधिपत्याखालील मुख्य बंदर अधिकारी, जलआलेखक, सागरी अभियंता यांचे सर्व कार्यालयासह महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड अधिनियम, १९९६ मधील [illegible] २०(फ) अनुसार महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड स्थापन होण्याच्या लगतच्या दिवसापूर्वी पूर्णपणे किंवा मुख्यत: लहान बंदराच्या कामकाजासाठी किंवा त्यांच्या संदर्भात शासनाकडे सेवेत असलेला प्रत्येक अधिकारी व कर्मचारी हे मंडळामध्ये समाविष्ठ करण्यास आलेले आहेत.

महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड अधिनियम, १९९६ मधील कलम २० (फ) अनुसार बोर्डाकडे समाविष्ट करण्यात आलेल्या अधिकारी व कर्मचाऱ्यांना"जर मंडळ स्थापन करण्यात आले नसते तर त्यांना ज्या पदावधीसाठी आणि सेवेच्या अटी व शर्तीवर ते पद धारण केले असते त्याच कालावधीसाठी आणि त्याच अटी व शर्तीवर त्यांचे पद धारण करेल." असा उल्लेख असल्याने बोर्डाकडे समाविष्ट करण्यात आलेल्या अधिकारी व कर्मचाऱ्यांना शासकीय कर्मचाऱ्यांप्रमाणे आर्थिक फायदे देण्याकरिता प्रथमत: उपरोक्त वाचा २ वरील शासन निर्णयानुसार त्यांना २ वर्षाकरिता शासकीय कर्मचारी म्हणून घोषित करण्यात आले. त्यानंतर वेळोवेळी शासकीय कर्मचारी म्हणून घोषीत करुन अंतिमत: दिनांक ३०जून, २००३ अखेर पर्यंत उपरोक्त वाचा ३ मधील शासन निर्णयानुसार शासकीय कर्मचारी म्हणून घोषित करताना, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड अधिनियम, १९९६ मधील कलम १०८ (३) च्या तरतुदीनुसार शासनाच्या पूर्व परवानगीने बोर्डाकडे वर्ग करण्यात आलेल्या अधिकारी व कर्मचाऱ्यांच्या रजा, रजा भत्ते, निवृत्ती वेतन, उपदाने, भविष्य निर्वाह निधी इत्यादी

नियमावली तयार करण्याबाबत बोर्डास सूचित करण्यात आले होते. त्याअनुषंगाने महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने निवृत्ती वेतन, निवृत्तीवेतनाचे अंशराशीकरण, भविष्य निर्वाह निधी व गट विमा योजना इत्यादी बाबतच्या नियमावली तयार करुन त्यास बोर्डाची मान्यता घेऊन शासनाकडे मंजुरीसाठी सादर केले आहेत. महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडून सादर करण्यात आलेल्या नियमावलीस मंजूरी देण्याबाबत शासनाचे विचाराधीन होते. आता शासन उपरोक्त बाबींवर नियमांचा व अधिनियमातील तरतुदीचा खुलासेवार उहापोह करुन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे.

शासन निर्णय:-बंदर संघटनेमध्ये महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड स्थापनेच्या लगतपूर्वी म्हणजे दि.२२ नोव्हेंबर, १९९६ पूर्वी जे शासकीय अधिकारी व कर्मचारी बंदर संघटनेमध्ये कार्यरत होते. त्यांना महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड अधिनियमातील कलम २० (फ) अनुसार बोर्डाकडे समाविष्ट करण्यात आले त्यामुळे त्या दिनांकापासून म्हणजे दि.२२ नोव्हेंबर, १९९६ पासून ते शासकीय कर्मचारी म्हणून राहिले नाहीत तथापि, अधिनियमातील तरतुदीनुसार बोर्डाकडे समाविष्ट करण्यात आलेल्या अधिकारी व कर्मचाऱ्यांचे हित लक्षात घेऊन त्यांचे पूर्वीचे म्हणजे शासन सेवेच्या अटी व शर्ती संरक्षित केल्या आहेत. यामुळे शासन निर्णयाव्दारे असे घोषित करते की, सदर अधिकारी व कर्मचारी मंडळाच्या सेवेत असेपर्यंत म्हणजे मूळ पदावर किंवा बोर्डाने नव्याने निर्माण केलेल्या पदावर पदोन्नतीव्दारे किंवा इतर प्रशासकीय कारणास्तव कार्यरत होऊन त्या पदावर नियत वयोमान सेवानिवृत्ती/ स्वेच्छा निवृत्ती/मृत्यू या दिनांकापर्यंत सदर अधिकारी व कर्मचारी हे शासकीय कर्मचारी म्हणूनच बोर्डाकडे राहतील व त्यांना शासकीय कर्मचाऱ्याप्रमाणे शासन नियमानुसार सेवानिवृत्ती वेतन व त्या अनुषंगिक इतर फायदे अनुज्ञेय राहतील.

सदरहू अधिकारी व कर्मचारी ज्यावेळेस नियत वयोमानानुसार सेवानिवृत्ती/ स्वेच्छा निवृत्त मृत्यूमुळे सेवा संपुष्टात येईल अशा वेळी सदर कर्मचाऱ्यांचे निवृत्तीवेतन, कुटुंब निवृत्ती वेतन महालेखाकार, महाराष्ट्र यांचेकडे पाठवून इत्यादी मंजूरीची कार्यवाही तसेच त्याअनुषंगिक देयके संबंधित अधिदान व लेखा 'कार्यालय कोषागार/उप कोषागार कार्यालयाकडून मंजूर करुन घेण्याबाबत शासन निर्णय दिनांक २३ एप्रिल, १९९७ अनुसार घोषित केलेले अधिकारीच नियंत्रण व आहरण व संवितरण अधिकारी म्हणून राहतील.

महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे समाविष्ट करण्यात आलेल्या उपरोक्त अधिकारी व कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्ते रजा वेतन रजा रोखीकरण, प्रवास भत्ते रजा प्रवास सवलत इत्यादी हे बोर्डाच्या महसूली उत्पन्नातून भागवावयाचे आहेत. परंतु उपरोक्त अधिनियमातील तरतूदीनुसार बोर्डाकडून सेवा निवृत्त होणाऱ्या अधिकारी व कर्मचारी यांना शासन कोषागारातून सेवा निवृत्ती वेतन व त्याअनुषंगिक इतर फायदे देण्यात येणार असल्याने या वरील बोजा शासन घेणार नाही याकरीता प्रतिनियुक्तीवर असलेल्या इतर शासकीय अधिकारी व कर्मचाऱ्यांचे ज्या प्रमाणे शासन नियमानुसार सेवानिवृत्ती वेतनापोटी अंशदान शासन कोषागारात जमा करण्यात येते त्याप्रमाणेच या शासन निर्णयाच्या दिनांकापासून उपरोक्त अधिकारी व कर्मचारी यांचे सेवानिवृत्ती वेतनाचे अंशदान महालेखाकार, महाराष्ट्र यांचेकडून परिगणना करुन घेऊन निश्चित केलेल्या दराने बोर्डाने

सदर रक्कम शासन कोषागारात जमा करावी.

शासनाने स्वायत्त मंडळातील अधिकारी व कर्मचाऱ्यांना निवृत्ती वेतन व अनुषंगीक फायदे शासन नियमानुसार लागू न करण्याचा धोरणात्मक निर्णय घेतल्यामुळे महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड स्थापन झाल्याच्या दिनांकापासून म्हणजे दि.२२ नोव्हेंबर, १९९६ किंवा त्यानंतर महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने नियुक्त केलेल्या अधिकारी व कर्मचारी यांना सेवा निवृत्ती योजना लागू करता येणार नाही याकरीता अशा कर्मचाऱ्यांच्या बाबतीत इतर मंडळ/ महामंडळ/स्वायत्त संस्था यामध्ये लागू असलेल्या अंशदायी भविष्य निर्वाह निधी योजना व विमा निगम तर्फे राबविण्यात येणाऱ्या गट विमा योजना राबविण्यात याव्यात व महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडून अशा कर्मचाऱ्यांच्या संदर्भात आता पर्यंत शासन जमा केलेल्या भविष्य निर्वाह निधी रक्कमा, गट विमा योजनेखालील रक्कम शासन कोषागारातून अधिकारी व कर्मचारी निहाय शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक वर्षाच्या कालावधीमध्ये काढून घेऊन वरील योजनांमध्ये जमा करण्याबाबत कार्यवाही करण्यात यावी. याकरिता वर उल्लेखिलेल्या अधिकारीच नियंत्रण व आहरण व संवितरण अधिकारी राहतील.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.सीआर ११०/२००३/व्यय-आठ दि.२७ जानेवारी, २००३ च्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(मानसी इंदुलकर)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

महालेखापाल-१(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई
महालेखापाल-१(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, नागपूर
महालेखापाल-१(लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई
महालेखापाल-१(लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, नागपूर
संचालक-१, लेखा व कोषागारे (गट विमा योजना) मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी मुंबई
निवासी लेखा अधिकारी, मुंबई
कोषागार अधिकारी रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग
उप कोषागार अधिकारी, मुरुड जंजिरा, वेंगुर्ला
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र सागरी मंडळ मुंबई
मुख्य बंदर अधिकारी, महाराष्ट्र सागरी मंडळ मुंबई
जल आलेखक, महाराष्ट्र सागरी मंडळ मुंबई

सागरी अभियंता, महाराष्ट्र सागरी मंडळ, मुंबई
वित्त विभाग (व्यय-८/अर्थ-१०)
मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री (बंदरे) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (बंदरे) यांचे खाजगी सचिव
बीयुडी-१ गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती.